# तो मुलगा ज्याला वाचनालयातल्या लोकांनी वाढवले

कार्ला मॉरिस

मराठी: अश्विनी बर्वे



मेल्विन, लिविंगस्टन सार्वजनिक वाचनालयात राहत असे.

म्हणजे बघा हं ... तो खरं तर तिथे राहत नसे.पण तो त्याचा खूप सारा वेळ वाचनालयात घालवत असे. ...

वाचनालयात प्रत्येक गोष्टीची आपली अशी एक जागा असते आणि मेल्विनला ती खूप आवडत असे. त्याला आवडणारी माणसे – मार्ज, बेट्टी, आणि लीओला– टेबलाच्या मागे नेहमी आपापल्या जागी असत.

जेव्हा मेल्विनला एखादी गोष्ट आवडत असे,तेव्हा वाचनालयातील लोक त्याला त्या विषयाबाबत सगळ्यात चांगली माहीती शोधण्यास मदत करत असत.

जेव्हा मेल्विनने काचेच्या भांड्यात काही विचित्र किडे गोळा केले, तेव्हा त्यांनी ते ओळखण्यासाठी, त्यांचे वर्गीकरण करण्यासाठी आणि त्यांची सूची करण्यासाठी मेल्विनला मदत केली.

जेव्हा मेल्विनने शाळेच्या नाटकात "विशाल वांग्याची “ भूमिका केली तेव्हा वाचनालयातील त्याच्या मित्रांनी मेल्विनला प्रेरणा मिळावी म्हणून गोष्टीचा शोध घेण्यास मदत केली.

मेल्विनला वाचनालयात नेहमी आपल्या प्रश्नांची उत्तरे मिळत असत- आणि तिथे तो खूप मस्तीही करत असे. मग एक दिवस मेल्विन नवीन गोष्टी शिकण्यासाठी आणि नवीन पुस्तके वाचण्यासाठी कॉलेजमध्ये गेला. मेल्विन वाचनालय आणि तिथल्या आपल्या मित्रांना नेहमीसाठी विसरला असेल का?

# तो मुलगा ज्याला वाचनालयातील लोकांनी वाढवले




कार्ला मॉरिस

चित्र: ब्रैड स्नेड




मेल्विन लिविंगस्टन पब्लिक लाइब्रेरी में रहता था.

देखो ... वो वास्तव में वहाँ नहीं रहता था. लेकिन वो लाइब्रेरी में अपना बहुत सारा समय बिताता था.




असे नाही की त्याला थोडेफार माहित करून घ्यायचे होते... नाही.. त्याला प्रत्येक गोष्टीबद्दल खूप काही जाणून घ्यायचे होते. तो खूप उत्सुक होता. आणि कोणत्याही जिज्ञासू व्यक्तीसाठी वाचनालय ही एक अद्भुत जागा असते.

वाचनालयात प्रत्येक गोष्टीची आपली अशी एक जागा असते, जे मेल्विनला खूप आवडत असे. त्याच्या आवडीची पुस्तके नेहमी आपल्या जागेवर रांगेत कपाटात लावून ठेवलेली असत. आणि त्याची आवडीची माणसे नेहमी आपापल्या टेबलाच्या मागे बसलेली असत.



जेव्हा मेल्विन खूप छोटा होता, तेव्हापासून
तो रोज शाळा सुटल्यावर वाचनालयात
जाऊ लागला.

तो नेहमी संदर्भ सेक्शनच्या
वाचनालयातल्या लोकांशी बोलण्यासाठी
थांबत असे. वाचनालयातले त्याला
बघून नेहमी प्रसन्न होत असत.

"हेलो मेल्विन!" मार्ज म्हणाला.

"आज शाळेत काय केलं?" बेट्टी विचारले.

"बाहेरची हवा कशी आहे?" लीओलाने विचारले.

मेल्विन, वाचनालयातल्या लोकांवर प्रेम करत
असे. त्याला ज्या गोष्टीत रस्त वाटे, त्यात
वाचनालयातल्या लोकांनाही रस होता.

"मला सापांच्या बाबत काही माहीती कुठे मिळू शकेल? त्याने एका दुपारी विचारले.

"ठीक आहे," मार्जने म्हटले. “तुला एकट्याला सापाला पाळायचे आहे का? त्यासाठी एक उत्तम पुस्तक आहे: "रेज़िंग स्नेक इन युअर बाथटब."



बेट्टी म्हणाली, “हे बघ एक कला आणि शिल्प याबाबत सुद्धा एक पुस्तक आहे. सापाच्या कातड्याची पर्स, बूट आणि इतर वस्तू बनवण्याबाबत.”

"अरे! सापांवर कविता सुद्धा आहेत,” लिओने म्हटले आणि त्याने मेल्विनसाठी सापाच्या संदर्भात एक वेबसाईट शोधली.

वाचनालयातील लोक असेही असतात जे अशा प्रकारे मदत करतात आणि म्हणून मेल्विनचे त्यांच्यावर प्रेम होते.



पहिलीत असतांना , मेल्विन आणि त्याच्या वर्गाची सहल गेली... एक अशी सहल दुपारी तो आपल्या मित्रांना आपला खजिना दाखवण्यासाठी वाचनालयात धावला – त्याच्या हातात काचेचे भांडे होते जे विविध प्रकारच्या किड्यांनी भरलेले होते.

“बघा माझ्याजवळ काय आहे!” तो ओरडत वाचनालयात घुसला. “तुम्ही मला हे ओळखण्यास मदत करू शकतात का?”






मेल्विन घसरला. आणि भांड्यातले सामान सगळीकडे पसरले.

लिविंगस्टन पब्लिक वाचनालयात ८७ गोगलगायी आणि किडे रांगत होते.





मार्ज, बेट्टी आणि लीओलाने लवकरच एक आपातकालीन बचाव दल तयार केले. किड्यांना वीस मिनटाच्या आत एकत्र केले आणि त्यांना ओळखले आणि त्यांचे वर्गीकरण करून त्यांची सूची तयार केली.

“तुम्ही हे सर्व एवढे लवकर कसे केले?” मेल्विनने विचारले.

“आम्ही असेच करतो,” लीओलाने समजावले.

“जेव्हा आम्ही अव्यवस्था बघतो ...” बेट्टी म्हणाली, “तेव्हा आम्ही वस्तू व्यवस्थित करतो आणि त्याची सूची करतो.” मार्ज म्हणाला.

“हा आमचा स्वभाव आहे.” मग त्याने "ए फील्ड गाइड टू इंसेक्ट्स" पुस्तक काढले आणि मेल्विनला दिली.

माफी मागण्यासाठी, मेल्विनने वाच्नाल्यातल्या लोकांना फुलांचा गुच्छ भेट म्हणून दिला. ती फुले त्याने वाचनालयातल्या बागेतली फुले निवडली.



नग ती वाचनालयात असलेल्या माशाच्या अक्वेरियमचे निरीक्षण करण्यासाठी थांबला.

“तुझा हात फिश टैंकमध्ये घालू नको.” मार्जने त्याला म्हटले.



“पण मी विचार करत होते,” मेल्विनने म्हटले, “सगळ्या जगात आणि सगळ्या तलावांमध्ये, नदीमध्ये आणि समुद्रात एकूण किती प्रकारचे मासे असतील? आणि सर्व कुत्री आणि मांजरे आणि घरे, गाड्या आणि ट्रक्टर या सर्वांचे किती वजन किती असेल?

वाचनालयातील माणसे इतर वाचकांमध्ये व्यग्र होते, पण लीओला माहीत होते की मेल्विनला आपल्या प्रश्नाची उत्तरे कुठे मिळतील. ती मेल्विन बरोबर कॉम्प्युटरवर बसली आणि त्यांनी एकमेकांच्या बरोबर उत्तरे शोधली.

त्यात कोणी त्याला मदत करू शकले नाही. वाचनालयातली माणसे अशीच होती.



दूसरीत असतांना, मेल्विनने शाळेच्या नाटकात "विशाल वांगे "मध्ये एक भूमिका केली. त्याने वाच्नाल्यातल्या लोकांबरोबर आपल्या भूमिकेचा अभ्यास केला.

“तू ही ओळ परत म्हण,” लीओलाने नवीन कैलडकोट पुरस्कार विजेत्यांची पुस्तके लावतांना म्हणाली.

"ऑडिटोरियमच्या मागे आपला आवाज फेकण्याचा प्रयत्न कर,” मार्जने वरच्या आणि स्पष्ट आवाजात म्हटले.

“पण सहज रहा!” बेट्टी म्हणाली,“ असे लक्षात घे की तू अभिनय करत नाही.” त्याने "जैविक बाग पत्रिका“ मधून जोरात वाचले ज्यामुळे  मेल्विनला आपली प्रेरणा शोधण्यास मदत मिळू शकेल.



दर्शकांनी "विशाल वांग्याची" थोडी थोडी तारीफ केली.

मेल्विनने वाचनातल्या सर्व कार्यक्रमात भाग घेतला. उन्हाळ्याच्या सुट्टीत तो "रीडिंग प्रोग्राम" पूर्ण करणारा प्रथम मुलगा असे. त्याला शाळेच्या नंतरच्या विशेष प्रोग्राम, बुक क्च्ल्ब आणि रात्रीचे चित्रपट आवडत असत. तो सर्व कार्यक्रमांना येत असे, मग वेळ कोणतीही असो.



पण वाचनालयात रात्री थांबण्याची पार्टी सगळ्यात चांगली असे. कारण झोपण्याच्या आधी बेट्टी, मुलांना गोष्ट वाचून दाखवत असे.





मेल्विन आपल्या स्लीपिंग बैग मध्ये एक एनसाइक्लोपीडिया घेऊन झोपला होता, हजारो पुस्तकांनी वेढलेला असल्याने तो स्वतःला श्रीमंत आणि भाग्यवान समजत होता.

तीसरीत असतांना, मेल्विनने बेसबॉल कार्डचा संग्रह करण्यास सुरुवात केली. तो वाचनालयात एका टेबलावर आपली कार्ड पसरत असे आणि त्यांना संघात, खेळाडू आदि गटात ती विभागत असे.





बेट्टीने मेल्विनला दाखवले की कार्डांना ॲसिडमुक्त खोक्यात कसे संग्रहित केले जाते. आणि लिओलाने त्याला इंटरनेट वर एक मुल्य सूची दाखवली. त्यांना ते करायचेच असे. वाचनालयातील लोक असे असतात.




चौथीत असतांना, मेल्विनने "स्पेलिंग बी" स्पर्धेत भाग घेतला.  मार्जने सुचवले की शाळा सुटल्यावर रोज शब्द माहीत करून घेण्यासाठी १०० वी आवृत्ती वाच. यात आश्चर्य नाही की मेल्विनने त्यात प्रथम क्रमांक मिळवला.



पांचवींत असतांना, मेल्विनने सोलर सिस्टम संस्था द्वारा आयोजित “प्रत्येक शहर जाणून घ्या” या स्पर्धेत सुवर्ण आणि रौप्य ही दोन्ही पदके जिंकली.

मार्ज, बेट्टी आणि लिओलाला त्याचा खूप अभिमान वाटत असे. ते त्यात त्याला काही मदत करू शकले नाही. वाचनालयातील माणसे अशी छान असतात.



सहावीत असतांना,  मेल्विनने असाधारण, पूर्णपणे तुमच्या कल्पनेच्या पलीकडे असणाऱ्या सायन्स फेअर मध्ये प्रवेश घेतला. वाचनालयातील लोकांनी त्याला त्या सर्व परियोजना समजून घेण्यासाठी माहिती गोळा करण्यास मजा केली. मेल्विनने त्यातही एक पदक जिंकले.

सातवींत असतांना, मेल्विनने "विज्ञान स्पर्धा" मध्ये भाग घेतला. मार्ज, बेट्टी आणि लिओलाला खूप गर्व झाला कारण मेल्विनने इतक्या वेगाने प्रश्नाची उत्तरे दिली त्याचा स्कोअर ठेवणाऱ्या कम्प्युटरचे सर्किट उडून गेले.

रोज शाळा सुटल्यावर, मेल्विन वाचनालयात जात असे. जेव्हा तो हायस्कूल मध्ये होता, तेव्हा त्याने तिथे पार्ट टाईम नोकरी केली.



मार्ज, बेट्टी आणि लिओला यांना मेल्विन कॉलेजमध्ये जाण्याच्यावेळी गर्वाने आणि आनंदाने रडू आले. “तो आमचा मुलगा आहे,” मार्ज म्हणाला. “आम्ही त्याला शिकण्यास मदत केली,” बेट्टी म्हणाली. “बघा, ही सगळी पुस्तके,” लिओला म्हणाली.



मेल्विन, कॉलेजमध्ये गेल्यावरही लिविंगस्टन वाचनालय आणि आपल्या तेथील मित्रांची आठवण काढत असे. तो त्यांना पुस्तकांच्या बाबत पत्र लिहित असे आणि ईमेल पाठवत असे. जी पुस्तके तो वाचत होता आणि ज्या गोष्टी तो शिकत होता त्याबाबत तो लिहित असे.





काही वर्षानंतर, लिविंगस्टन पब्लिक लायब्रेरीमध्ये
अजून एक मुलगा आला... आणि त्यालाही
वाचनालयाविषयी प्रेम वाटू लागले.

"हॅलो, स्टर्लिंग," मार्ज म्हणाली.
“तुझी फिल्ड ट्रीप कशी झाली?”
बेट्टीने विचारले.

“तुला ते किडे ओळखण्यासाठी काही
मदत हवी आहे का?” लिओलाने
विचारले.



“आम्ही त्वरित त्यांची ओळख पटवून घेऊन त्याचे वर्गीकरण करून कॅटलॉग करू शकतो. आपण काय करू या? लिविंगस्टनच्या नवीन सदस्याने म्हटले, “बघ आम्ही असेच आहोत.”

